**अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेकडील सहाय्यक पोलीस आयुक्त, स्टाफ ऑफीसर हे पद सहाय्यक पोलीस आयुक्त, दहशतवाद विरोधी पथक, पुणे म्हणून उपलब्ध करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ ३११५/प्र.क्र. २१४/ पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई -४०० ०३२.

तारीख: ३ जुलै, २०१५.

वाचा :

1. **शासन निर्णय क्रमांकः एसएसए-१०/०३/१५/वि.शा.४, दि. ८ जुलै, २००४.**
2. **शासन निर्णय क्रमांकः एसएसए-१००६/प्र.क्र. ३६३/विशा-४, दि. २३ एप्रिल, २००७.**
3. **शासन निर्णय क्रमांकः आयएसएस-१००९/प्र.क्र. ६०/विशा-४, दि. २७ जुलै, २००९.**

प्रस्तावना :

राज्यातील दहशतवाद विरोधी कारवायांना आळा घालण्याकरीता दि. ८ जुलै, २००४ च्या शासन निर्णयान्वये दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई स्थापन करण्यात आले आहे. दहशतवादी कारावायांना आळा घालण्यासाठी दि. २३ एप्रिल, २००७ च्या शासन निर्णयान्वये औरंगाबाद व नागपूर येथील युनिट करिता प्रत्येकी एक याप्रमाणे दोन दहशतवाद विरोधी पथकांची स्थापना करण्यात आली आहे आणि नाशिक व पुणे येथे प्रत्येकी एक याप्रमाणे दोन दहशतवाद विरोधी उपपथकांची स्थापना करण्यात आली आहे. दि. २७ जुलै, २००९ च्या शासन निर्णयान्वये, दहशतवादविरोधी पथकांचे उन्नतीकरण करण्याबाबत निर्णय घेतला आहे. तथापि, पुणे युनिटच्या कार्यक्षेत्रात, जंगली महाराज रोड बॉम्बस्फोट, फरासखाना बॉम्बस्फोट, नक्षलविरोधी गुन्हे दाखल असुन सिमी, इंडियन मुजाहिद्दिन यासारख्या दहशतवादी संघटनांचे मॉडयुल्स, स्लिपर सेल्स पुणे शहर, सोलापूर शहर व कोल्हापूर परिक्षेत्रामध्ये कार्यरत असल्याचे वेळोवेळी निदर्शनास आलेले आहे. या भागाचे शहरीकरण झपाटयाने वाढत असून त्यामुळे गुन्हेगारीचे प्रमाण वाढत आहे. तसेच नक्षलवादी संघटनांच्या कार्यकर्त्यांना पुणे शहर आणि परिसरातून विविध गुन्हयात अटक करण्यात आली आहे. बेकायदेशीर कृत्ये (प्रतिबंधक) अधिनियम, १९६७ आणि महाराष्ट्र संघटीत गुन्हेगारी प्रतिबंधक कायदा, १९९९ अंतर्गत दाखल गुन्हयांची चौकशी करण्यासाठी सहाय्यक पोलीस आयुक्त दर्जाचा अधिकारी

असणे आवश्यक आहे. त्यानुसार दहशतवाद विरोधी पथक पुणे येथे सहाय्यक पोलीस आयुक्त हे पद उपलब्ध करुन देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :**

वरील प्रस्तावनेत नमुद केल्यानुसार या शासन निर्णयान्वये अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेसाठी अंतर्गत वर्गीकरणाने उपलब्ध केलेले स्टाफ ऑफीसर (सहाय्यक पोलीस आयुक्त) हे एक पद पोलीस उपमहानिरिक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे कार्यालयाकडे सहाय्यक पोलीस आयुक्त, दहशतवाद विरोधी पथक, पुणे म्हणून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०४१२२४०८७९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPT,CID - 918120, postalCode=400032, st=Maharashtra, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2015.07.04 12:26:00 +05'30'

**(द.ह. कदम)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव
३. मा.राज्यमंत्री (गृह/शहरे) यांचे खाजगी सचिव
४. मा.राज्यमंत्री (गृह/ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
५. अप्पर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
६. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) महाराष्ट्र मुंबई/ नागपूर
९. अप्पर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, मुंबई

१०.पोलीस आयुक्त, मुंबई

११.सर्व विशेष पोलीस महानिरिक्षक

१२.आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई

१३.पोलीस उपमहानिरिक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे.

१४.सर्व पोलीस आयुक्त

१५.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१६.निवासी लेखा अधिकारी, मुंबई

१७.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

१८. सर्व सहसचिव/उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, गृह विभाग, मंत्रालय

१९.निवडनस्ती/ पोल-३